**कोषागारात रोख देय अनुदान**

**अर्थसंकल्पीय अनुदान २०१०-११**
**विशेष घटक योजना (मागणी क्र. वाय-२ लेखाशीर्ष २२१५१८०७)** उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युतपंप बसविणे, हातपंप /विद्युतपंप देखभाल दुरुस्ती व कमी क्षमतेच्या विंधण विहिरीचे जलभंजन करणे या कार्यक्रमासाठी अनुदान

**महाराष्ट्र शासन**
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
शासन निर्णय क्र. बीयुडी-१०१० /प्र.क्र.१३३/पापु-१५
मंत्रालय, मुंबई -३२,
**दिनांक- १४ मार्च ,२०११**

वाचा:- १. शासन निर्णय, ग्राम विकास विभाग, क्र. ग्रापापु-१०८९ /सीआर २६८९/४३, दिनांक १७ जानेवारी १९९०
२.शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, क्र. भूजल १०९८/प्र.क्र.४६५/पापु१५ दिनांक १६ ऑक्टोबर, १९९८
३.शासन निर्णय, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, समक्रमांक दिनांक ३० एप्रिल,२०१०, दिनांक २८ जून,२०१० व दि. ९ फेब्रुवारी, २०११
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अंदाज -२०.१०/सीआर ७१/२०१०/अर्थसंकल्प ३ दिनांक १८ मे, २०१०

**प्रस्तावना:-**

उच्च क्षमतेच्या विंधण विहिरीवर पुरेश्या पाण्याच्या उपलब्धतेची निदान ८-१० वर्षे शाश्वती, संबंधित गावात/वस्त्यात अशा प्रकारच्या उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युतपंप बसविण्याची आवश्यकता, याबाबी विचारात घेऊन विद्युतपंप बसविण्याचा कार्यक्रम राबविण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. या कार्यक्रमासाठी गावे/वाडयांची निवड करण्याकरीता संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये, निकष विहित करण्यात आले आहेत. तसेच, विंधन विहिरीवर बसविलेल्या हातपंप व विद्युतपंपाची देखभाल व दुरुस्ती करण्याकरिता आणि पिण्याच्या पाण्यासाठी घेतलेल्या जुन्या विंधण विहिरींचे पुनरुज्जीवन (जलभंजन) करण्याकरिता अवलंबवावयाची कार्यपध्दती व निकष संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये विहित करण्यात आले आहेत.

सन २०१०-११ या आर्थिक वर्षात ग्रामीण पाणी पुरवठा या जिल्हास्तरीय योजनांतर्गत कार्यक्रमाखालील विशेष घटक योजनेंतर्गत उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युत पंप बसविणे तसेच हातपंप/ विद्युतपंप देखभाल व दुरुस्ती आणि विंधण विहिरींचे जलभंजन या कार्यक्रमाकरीता "२२१५ १८०७ " या लेखाशीर्षाखाली एकूण रु.१७२.८१ लक्ष इतकी तरतूद करण्यात आली आहे. यापैकी, रु.१३८.२४८ लक्ष अनुदान संदर्भ क्र.३ येथील शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात आलेले आहे.

लेखाशीर्ष २२५ १८०७ खाली मंजूर तरतूदीपैकी, रु.१७.२८ लक्ष निधी आता अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध झाला असून पैकी रु.१६.४८० लक्ष निधी वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**कृ.मागे पहा...**

**<u>शासन निर्णय:-</u>**

सन २०१०-११ या आर्थिक वर्षात **उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युत पंप बसविणे तसेच हातपंप/ विद्युतपंप देखभाल व दुरुस्ती हा कार्यक्रम राबविण्याकरिता मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, यांना रु. १६.१६६ लक्ष ( रुपये सोळा लक्ष सोळा हजार सहाशे फक्त)** आणि **विंधण विहिरींचे जलभंजन हा कार्यक्रम राबविण्यासाठी संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना रु.०.३१४ लक्ष (रुपये एकतीस हजार चारशे फक्त) <u>या प्रमाणे एकूण रु.१६.४८ लक्ष (रुपये सोळा लक्ष अठ्ठेचाळीस हजार फक्त) एवढे अनुदान मंजूर करण्यात येत असून सोबतच्या विवरणपत्रातील स्तंभ-४, ६ व ८ मध्ये दर्शविल्यानुसार अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत आहे.</u>**

२. उपरोक्त मंजूर अनुदानातून उच्च क्षमतेच्या विंधण विहिरीवर विद्युत पंप बसविण्याचा कार्यक्रम , हातपंप/ विद्युतपंप देखभाल व दुरुस्ती आणि विंधण विहिरींचे पुनरुज्जीवन (जलभंजन ) हे कार्यक्रम संदर्भ क्र.१ व २ येथे नमूद शासन निर्णयातील विहित कार्यपध्दती, अटी व शर्तीच्या अधीन राहुन राबविण्यात यावेत. सदर अनुदान खर्च करतांना पुढील सुचनांचे पालन करावे.

१. हे अनुदान मंजूर करण्यांत आलेल्या विनिर्दिष्ट प्रयोजनासाठीच खर्च करावे.
२. या अनुदानातून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे ठेवावे.
३. या कार्यक्रमांतर्गत घेतलेल्या कामांचा भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद तसेच संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांनी शासनास दर महिन्याच्या ५ तारखेपर्यंत न चुकता सादर करावा.
४. मंजूर अनुदानाची उपयोगिता प्रमाणपत्रे शासनाकडे विहित प्रपत्रात सादर करण्यात यावी.
५. तसेच, मासिक विवरणपत्रानुसार (Cash Flow) अनुदान खर्ची घालण्यात यावे.
६. मंजूर अनुदानाच्या खर्चाचा महालेखापाल कार्यालयात नोंदलेल्या खर्चाबरोबर मेळ घालण्यात यावा व विहित अहवाल जिल्हापरिषदांनी शासनाकडे सादर करावेत.

३. या बाबतचा खर्च, "मागणी क्र. वाय- २, २२१५-पाणी पुरवठा व स्वच्छता- ०१ पाणी पुरवठा-१०२ ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रम-(डी)अनुसूचित जातीकरीता विशेष घटक योजना- पिण्याचे पाणी पुरवठ्याचा ग्रामीण कार्यक्रम-(०२)(१२) वीजपंप बसविणे/हातपंपाचे विद्युतपंपात रुपांतर करणे (२२१५-१८०७)" या लेखाशिर्षाखाली खर्ची घालावा व त्या शीर्षाखाली २०१०-११ या आर्थिक वर्षामध्ये मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा . सदर शासन निर्णय शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्यांचा सांकेतांक क्र. २०११०३१५१९०१५३००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

**(श.वि.दुर्वे)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. विभागीय आयुक्त, कोकण, नाशिक, पुणे. औरंगाबाद
२. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे

३. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, ठाणे, नाशिक, जळगाव,अहमदनगर, सातारा, सोलापूर, कोल्हापूर, बीड,
४. उप संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे, नाशिक, औरंगाबाद
५. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ठाणे, नाशिक, जळगाव,अहमदनगर, सातारा, सोलापूर, कोल्हापूर, बीड,
६. वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, जळगाव, अहमदनगर, सोलापूर
७. उपअभियंता (यां), ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, ठाणे, नाशिक, जळगाव,अहमदनगर, सातारा, सोलापूर, कोल्हापूर, बीड,
८. कोषागार अधिकारी , ठाणे, नाशिक, जळगाव,अहमदनगर, सातारा, सोलापूर, कोल्हापूर, बीड,
९. महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
१०. महालेखापाल, महाराष्ट्र-२, (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), नागपूर
११. मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१२. उपमुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, कोकण, नाशिक, पुणे. औरंगाबाद,
१३. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई
१४. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील कार्यासने पापु-०४, पापु-०५ , पापु ०७ व पापु-२०
१५. निवड नस्ती पापु-१५

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र. बीयुडी १०१० /प्र.क्र. १३३ /पापु १५ दि. १४मार्च ,२०११ सोबतचे विवरणपत्र

<u>विवरणपत्र</u>

(रुपये लक्ष)

| अ.क्र. | जिल्हा | उच्च क्षमतेच्या विंधण विहिरींवर विद्युतपंप बसविणे कार्यक्रम | | हातपंप देखभाल व दुरुस्ती कार्यक्रम | | कमी क्षमतेंच्या विंधण विहिरीचे जलभंजा कार्यक्रम | | सन २०१०-११ या आर्थिक वर्षात या शासन निर्णया-वये लेखाशीर्ष २२१५ १८०७ खाली एकूण वितरीत करण्यात येत असलेले अनुदान (स्तंभ ४+६+८ ची बेरीज) | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | | सन २०१०-११ या आर्थिक वर्षात मंजूर तरतूद | या शासन निर्णयावये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद यांा अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुा देण्यात येत असलेले आुदा | सन २०१०-११ या आर्थिक वर्षात मंजूर तरतूद | या शासन निर्णयावये मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हापरिषद यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुा देण्यात येत असलेले अनुदान | सन २०१०-११ या आर्थिक वर्षात मंजूर तरतूद | या शासन निर्णयावये संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात येत असलेले अनुदान | | |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | |
| १ | ठाणे | ०.०० | ०.००० | ०.८० | ०.०८० | ०.०० | ०.००० | ०.०८० | (रुपये आठ हजार फक्त) |
| २ | नाशिक | ०.०० | ०.००० | ४.०० | ०.४०० | ०.०० | ०.००० | ०.४०० | (रुपये चाळीस हजार फक्त) |
| ३ | जळगाव | १०.०० | १.००० | ०.०० | ०.००० | ०.०० | ०.००० | १.००० | (रुपये एक लक्ष फक्त) |

| | | | | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| ४ | अहमदनगर | १०.७५ | १.०७५ | ०.०० | ०.००० | १.१४ | ०.११४ | १.१८९ | (रुपये एक लक्ष अठरा हजार नऊशे फक्त) |
| ५ | सातारा | ३१.९६ | ३.१९६ | ०.०० | ०.००० | ०.०० | ०.००० | ३.१९६ | (रुपये तीन लक्ष एकोणीस हजार सहाशे फक्त) |
| ६ | सोलापूर | २०.०० | २.००० | ०.०० | ०.००० | ८.०० | ०.००० | २.००० | (रुपये दोन लक्ष फक्त) |
| ७ | कोल्हापूर | ८४.१६ | ८.४१५ | ०.०० | ०.००० | ०.०० | ०.००० | ८.४१५ | (रुपये आठ लक्ष एकेचाळीस हजार पाचशे फक्त) |
| ८ | बीड | ०.०० | ०.००० | ०.०० | ०.००० | २.०० | ०.२०० | ०.२०० | (रुपये वीस हजार फक्त) |
| | **एकूण :-** | १५६.८७ | १५.६८६ | ४.८० | ०.४८० | ११.१४ | ०.३१४ | १६.४८० | **(रुपये सोळा लक्ष अठ्ठेचाळीस हजार फक्त)** |

**(श.वि.दुर्वे)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासा**